**स्थानिक स्वराज्य संस्थांच्या प्राथमिक शाळांसाठी वितरित करण्यात येणाऱ्या सादिल अनुदानाच्या रकमेतून खर्च करावयाचा बाबींमध्ये सुधारणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक : उमाशा-२०२०/प्र.क्र.१३/एसएम-४,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०४ जून, २०२०.

**वाचा :-** (१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक : पीआरई-१०९४/ ७०४/(दोन)/ प्राशि-१, दिनांक १४ नोव्हेंबर, १९९४.

**प्रस्तावना** :-

राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांनी चालविलेल्या प्राथमिक शाळांकरिता भौतिक, शैक्षणिक सुविधा व दैनंदिन उपयोगाचे साहित्य उपलब्ध करण्यासाठी मागील वर्षाच्या वेतन खर्चांच्या ४ टक्के पर्यंत सादिलवार खर्च करण्यास संदर्भातील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सादिलवार खर्चासाठी मंजूर केलेल्या रकमेपैकी शाळा पातळीवर ८० टक्के रक्कम खर्च करावयाची असून त्यासाठी अनुज्ञेय बाबींची मार्गदर्शक यादी सदर शासन निर्णयासोबच्या प्रपत्र-“अ” मध्ये देण्यात आली आहे. तसेच जिल्हा पातळीवर २० टक्के रक्कम खर्च करावयाची असून त्यासाठी अनुज्ञेय बाबींची मार्गदर्शक यादी प्रपत्र “ब” मध्ये देण्यात आलेली आहे. सदर खर्च करावयाच्या अनुज्ञेय बाबींच्या यादीमध्ये सुधारणा करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत आता शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांच्या प्राथमिक शाळांकरिता दिल्या जाणाऱ्या ४ टक्के सादिल अनुदानाच्या रकमेतून खर्च करावयाच्या अनुज्ञेय बाबींची, शासन निर्णय, क्रमांक : पीआरई-१०९४/ ७०४/(दोन)/ प्राशि-१, दिनांक १४ नोव्हेंबर, १९९४ सोबतची “प्रपत्र अ” व “प्रपत्र ब” ही यादी रद्द करण्यात येत असून त्याऐवजी सदर ४ टक्के सादिल अनुदानातून खर्च करावयाच्या अनुज्ञेय बाबींची सुधारित यादी सोबत जोडली आहे. सन २०२०-२१ या आर्थिक वर्षापासून उपलब्ध होणाऱ्या ४ टक्के सादिल अनुदानाच्या रकमेतून सोबत जोडलेल्या यादीतील बाबींसाठीच खर्च करण्यात यावा.

२. या योजनेसाठी होणारा खर्च “२२०२-सर्वसाधारण शिक्षण-०१-प्राथमिक शिक्षण १०३-प्राथमिक शिक्षणासाठी स्थानिक संस्थांना सहाय्य-१०३(एक)(ए)(एक) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने (२२०२ ०१७३) मागणी क्रमांक ई-२” या अर्थशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२०११०६१७२८२४८७२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6,
serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2020.11.06 17:31:25 +05'30'

**( इ. मु. काझी )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे,
२) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक/प्राथमिक/प्रौढ व अल्पसंख्याक/SCERT/ बालभारती) महाराष्ट्र राज्य, पुणे-१,
३) सर्व जिल्हाधिकारी,
४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
७) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
८ सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१०) निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
११) सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक/प्रौंढ)
१२) सर्व अधिक्षक, वेतन पथक (प्राथमिक/माध्यमिक)
१३) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१४) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
१५) ग्राम विकास विभाग, मंत्रालय,
१६) निवडनस्ती एसएम-४.

**शासन निर्णय, क्रमांक : उमाशा-२०२०/प्र.क्र.१३/एसएम-४, दि. ०४ जून, २०२० च्या सोबतची यादी**

“सादिल अनुदानातून खर्च भागविण्यासाठी अनुज्ञेय करण्यात आलेल्या वस्तू/बाबी ”

१) शाळा इमारत व स्वच्छतागृहांची देखभाल व दुरुस्ती.
२) वैयक्तिक स्वच्छतेसाठी लागणारी आवश्यक सामुग्री (उदा.साबण,सॅनिटाझर्स इ.)
३) इंटरनेट जोडणी व देयक.
४) विविध डिजीटल व संगणक साहित्य आणि त्यासोबतची उपकरणे (Accessories) यांची देखभाल व दुरुस्ती.
५) पिण्याच्या पाण्याच्या व्यवस्थेची देखभाल व दुरुस्ती.
६) स्टेशनरी व विविध प्रकारचे रजिस्टर्स यांची खरेदी.
७) अग्निप्रतिबंधक यंत्रांची पुनर्भरणी (Refilling of fire extinguisher).
८) प्रथमोपचार पेटी ( First Aid Box ).
९) वीज बील (रु.१०००/- प्रति शाळा प्रति महिना या मर्यादेत )- इतर निधीतून वीज बील भरले नसल्यास .

*********